Convertion in Regular Temporary Establishment:- Shri Ganesh Bansilal Zodape working under S.E. & Administrator, CADA, Nagpur

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण- **श्री. गणेश बन्सीलाल झोडापे , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. एसयुटी-२०१०/ (५६/२०१०)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २.७.२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१
२) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र जा. क्र. ४०४७/आ-७/लाविप्रा/२०११ दिनाक २४/५/२०११.

**प्रस्तावनाः**

अधिक्षक अभियंता व प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, यांनी श्री. गणेश बंन्सीलाल झोडापे यांची दि १.५.८९ रोजी रोजंदारी आस्थापनेवर मजूर म्हणून नियुक्ती केली होती. श्री. झोडापे यांना दि. ८.५.९० रोजी कामावरुन कमी करण्यात आले. त्यामुळे त्यांनी सदर कार्यवाहीविरुध्द मा. कामगार न्यायालय, नागपूर येथे दावा दाखल केला त्यात संबंधित कामगारांस सेवेतून कमी केल्याचे दिनांकापासून थकबाकी न देता सेवा सातत्यासह सेवेत पुनःस्थापित करण्यात यावे असा निर्णय झाला. सदर निर्णयाविरुध्द शासनाच्यावतीने मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे याचिका दाखल केली असता, मा. कामगार न्यायालयाचा निर्णय कायम करुन याचिका खारीज केली. श्री. झोडापे यांनी मा. कामगार न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी होत नसल्यामुळे मा. औद्योगिक न्यायालय, नागपूर येथे अवमान याचिका दाखल केली होती. सदर याचिकेविरुध्द शासनाच्यावतीने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे याचिका दाखल केली असता, त्यामध्ये श्री. झोडापे यांना सेवासातत्यासह सेवेत पुर्वीप्रमाणेच पुनःस्थापित करण्यात यावे आणि दि. २६.६.९८ पासून सेवेत पुनःस्थापित करण्याच्या दिनांकापर्यंत ३०% वेतनाची थकबाकी देण्यात यावी असा निर्णय झाला. सदर निर्णयाविरुध्द विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायानुसार वरिष्ठ न्यायालयात अपील दाखल न करता मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाची कार्यवाही करण्याकरिता सदर प्रस्ताव मा. सचिव समितीच्या दि. ११.३.११ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेने श्री. झोडापे यांना सेवेत सेवासातत्यासह सेवेत मजुर या पदावर दि.२५.३.२०११ रोजी पुनःस्थापित करण्यात आले. तसेच

२६.६.९८ पासून सेवेत पुन:स्थापित करेपर्यंतच्या दिनांकापर्यंतची ३० टक्के वेतनाची थकबाकी अदा करण्यात आली आहे. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर याच्या दि १८.१०.१० च्या न्यायनिर्णयानुसार श्री. झोडापे यांना सेवासातत्य दिल्यामुळे कालेलकर करारातील तरतूदीप्रमाणे मजुर या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. झोडापे यांची दि १.५.८९ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. झोडापे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( १.५.९४ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा आहे. त्यामुळे श्री. गणेश बन्सीलाल झोडापे यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. गणेश बन्सीलाल झोडापे | रोजंदारी | मजूर १.५.८९ | १.५.९४ | मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५००-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३ श्री. गणेश बन्सीलाल झोडापे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४.     अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत_शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५.     श्री. गणेश बन्सीलाल झोडापे यांना मजूर या पदावर दि.१.५.१९९४ पासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्यानंतर मा.उच्च न्यायालयाच्या दि.१८.१०.२०१० न्यायनिर्णयातील निदेशानुसार कामगार न्यायालयाच्या दि२६.६.९८ च्या न्यायनिर्णयाच्या दिनांकापासून त्यांना कामावर पुनःस्थापित केल्याच्या दिनांकापर्यतची (दि.२५.३.२०११) वेतन फरकाच्या थकबाकीची ३० टक्के रक्कम अनुज्ञेय आहे. त्यामधून न्यायनिर्णयानुसार दि.२६.६.९८ पासून रोजदांरी आस्थापनेवर पुनःस्थापित केलेल्या दिनांकापर्यची ३० टक्के यापूवी अदा केलेली रक्कम वजा करता उर्वरित वेतन फरकाच्या थकबाकीची रक्कम श्री.झोडापे यांना देय होईल. त्यापैकी दि.२६.६.९८ पासून दि.३१.८.२००० पर्यतच्या वेतन फरकाच्या थकबाकीची रक्कम (सर्व भत्यासहीत) दहा समान वाषीक हप्त्यात सन २०१२-१३ या आथिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा करावी.

६.     दि. १.९.२००० पासून त्यांना कामावर पुनःस्थापित केल्याच्या दिनांकापर्यतच्या वेतन फरकाच्या थकबाकीची ३० टक्के रक्कम व त्यानंतरची वेतन फरकाची १०० टक्के रक्कम संबंधित कर्मचा-यांस रोखीने द्यावयाची असून ती धनादेशाद्वारे (Cheque ) अदा करावयाची आहे.

७.  तसेच श्री. झोडापे यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांका पासून
करण्यात यावी. सदर कर्मचा-यावर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-१२ या आथीक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८.  हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

९.  हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक : २०११०७०२१०४३२४००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: प्रपत्र ब

अ.अ.कोदे

**( अ.अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर

अधिक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नागपूर
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.